# मगरीचे

# मास्टरपीस पेंटिंग

मैक्स



मगर एक महान कलाकार होण्यासाठी खूप मेहनत करत होती. ती रोज एक चित्र काढे. पण कितीही प्रयत्न केले तरी तिच्या स्टुडिओमध्ये कोणीच पेंटिंग विकत घ्यायला येत नसे. शेवटी हत्ती आपल्या खोलीच्या भिंतीवर लावण्यासाठी काही शोधतो. पण मगरीच्या चित्रांतून एक चित्र निवडणे सोप्पं काम नव्हतं. कारण ती सगळी चित्रं खूप सुंदर होती. हत्तीचा अनिर्णय मगरीसाठी प्रेरक ठरतो. ती आपल्या ग्राहकांना खुश करण्यासाठी तिच्या उत्साहाला अजून रचनात्मक उंचीवर नेवून ठेवते. त्याचे आश्चर्यकारक परिणाम दिसू लागतात आणि खऱ्या अर्थाने एक उत्कृष्ट कलाकृती तयार होते - कल्पनेच्या शक्तीला एक सुंदर श्रद्धांजली.





# मगरीचे
# मास्टरपीस पेंटिंग

मैक्स

मराठी : अश्विनी बर्वे





मगर एक महान कलाकार होती. ती खूप मेहनत करत असे आणि रोज एक नवीन चित्र काढत असे. पण कोणीच स्टुडिओ मध्ये तिचं पेंटिंग खरेदी करायला येत नसे.



तिच्या शेजारीच एक हत्ती राहत असे.त्याचे आपल्या घरावर खूप प्रेम होते, पण त्याला घरात काहीतरी कमी आहे असेही वाटत होते. घर सुंदर दिसण्यासाठी भिंतीवर एका सुंदर पेंटिंगची गरज होती.



“मी माझ्या शेजारच्या, कलाकाराला भेटायला जाईन,” हत्ती म्हणाला, “कदाचित ती मला मदत करू शकेल.” मग तो मगरीच्या घरी गेला आणि त्याने दार वाजवलं.

"हॅलो," मगर म्हणाली, “मी तुम्हांला काय मदत करू शकते?”

“मला एक पेंटिंग खरेदी करायचं आहे,” हत्ती म्हणाला. “पेंटिंगशिवाय माझं घर खूप रिकामं रिकामं वाटत आहे.”

मगर खूप प्रसन्न झाली. तिने आपला ब्रश एका कोपऱ्यात फेकला आणि मग आपली सारी चित्रं तिने काढली.





हत्तीला सर्वं चित्रं एवढी सुंदर वाटली की तो ठरवू शकला नाही की कोणतं चित्र खरेदी करावं?

“माझ्या डोक्यात एक विचार आहे,” मगर म्हणाली. “मी तुमच्यासाठी काहीतरी खास पेंटिंग करेन-तुम्हांला त्या चित्रात प्रत्येक ती गोष्ट दिसेल जी तुम्हांला हवी आहे! कृपा करून तुम्ही पुढच्या आठवड्यात परत या.”



हत्ती उत्साहित होवून घरी गेला. त्याला लवकरच कळलं की जेव्हा आपण एखाद्या गोष्टीची वाट पाहत असतो तेव्हा एक आठवडा खूप हळू वेगानं संपतो. म्हणून त्याने आपले घर रंगवायला सुरुवात केली.



मग त्याने मागच्या आठवड्याचे वर्तमानपत्र परत वाचले. शेवटी आपलं नवीन पेंटिंग आणण्याचा दिवस आला.

मगरीने त्याचं उत्साहाने स्वागत केलं. हे स्पष्ट दिसत होतं की तिने चित्रावर खूप मेहनत घेतली होती. सगळीकडे रंगाच्या ट्यूब आणि ब्रश पसरलेले होते आणि तिच्या कपड्यांवर सुद्धा रंग लागला होता. चेहऱ्यावर हास्य आणत, मगरीने आपलं चित्रं उचललं आणि ते हत्तीला दिलं.



त्याने घराची सफाई केली आणि आपला बगीचा सुद्धा नीटनेटका केला.



“हे राहिलं आपलं विशेष चित्र,” मगर गर्वाने म्हणाली.

“पण, मगरे!” हत्ती म्हणाला, “यावर तर काहीच नाही. हे तर एकदम कोरं, रिकामं आहे!”

“हे रिकामं दिसत आहे,”मगर चुपचाप म्हणाली, “पण तुम्ही आपले डोळे बंद करून इतर कोणत्याही चित्राबाबत विचार करा.”



"एक बर्फीले दृश्य,“ हत्ती म्हणाला,आणि मग त्याने आपले डोळे बंद केले. त्याला खूप आश्चर्य वाटले जेव्हा त्याला हिवाळ्यात पडणाऱ्या बर्फाचे चित्र दिसले. जसे की नेहमी ख्रिसमस कार्डवर असते.

“छान!“ तो ओरडला. “मी हे घेवून जाईन.”

मग हत्तीने चित्राचे पैसे दिले आणि ते आपल्या घरी घेवून आला.





हत्तीने चित्र लक्षपूर्वक भिंतीवर लावलं आणि तो त्याच्या समोर आपली खुर्ची टाकून बसला. मग त्याने आरामात आपले डोळे बंद केले.

त्याला सगळ्यात आधी एक डच पवनचक्की दिसली आणि आकाशात सफेद ढग दिसले, ठीक तसे जसे त्याला वाटत होते.



त्यानंतर, निळे पहाड आणि सूर्यास्ताबरोबर एक ट्रॉपिकल दृश्य दिसलं.



तेव्हाच त्याला घोड्यावर एक प्रवासी दिसला. हत्तीने स्वतः त्याचा लगाम हातात घेतला होता. त्याने घोड्याला पळवलं आणि रात्रभर तो वेगाने धावत होता.



चित्रं सारखं बदलत राहिलं. मगरीचे बिलकुल बरोबर होते, हत्तीला ती कलाकृती उच्च दर्जाची वाटत होती.

अशा प्रकारे दिवस जात होते आणि हत्ती मोठ्या कष्टाने आपल्या खुर्चीवरून उठला. त्यामुळे त्याची बाग पार उजाड होत होती.



एका रात्री खूप गरम होत होतं आणि हत्तीला झोप येत नव्हती. तो अंथरुणात कुस बदलत होता.

हे खूप चुकीचे आहे की माझं उत्कृष्ट चित्र माझ्या झोपण्याच्या खोलीत नाही. जर ते असतं तर यावेळी मी बर्फ पडण्याचा आनंद घेवू शकलो असतो, त्याने विचार केला.पण जेव्हा त्याने आपले डोळे बंद केले, तेव्हा सफेद डोंगरांमध्ये एक छोटंसं गाव खूप स्पष्ट दिसत होतं. धूसर आकाशातून खाली बर्फ पडत होता.

हत्ती आपल्या अंथरूणावरून उठला. “हे काय होत आहे?” तो आश्चर्याने ओरडला.



त्याने परत-परत आपले डोळे मिटले. प्रत्येक वेळी, त्याला हवं ते प्रकट होत असे, मग ते काहीही असो-स्वयंपाक घर असो की हॉल मध्ये. तसं तर चित्र स्थायी स्वरुपात अजूनही बैठकीच्या खोलीत लावलेलं होतं.



दुसऱ्या दिवशी हत्ती आपल्या शेजाऱ्याकडे परत गेला.

"मगरे," तो रागाने म्हणाला, "तू मला धोका दिला! हे बघ, मला एक खरंखुरं चित्र हवं!"

"तुम्हांला हवं तर ते बदलू शकतात," मगर म्हणाली. ती अजिबात त्रासली नव्हती. "तुम्हांला पाहिजे ते चित्र तुम्ही निवडू शकतात."



एकदा परत हत्तीला नीट ठरवता आलं नाही. सूर्यास्त, समुद्रातलं एक जहाज, फळांच्या बरोबर एक शांत जीवन. ती सगळी सुंदर चित्रं होती.



पण त्याच्यासारखी मास्टरपीस अशी कलाकृती नव्हती.

“मी तुम्हांला काय म्हटलं होतं?” मगर म्हणाली, “हे चित्र एक खूप विशेष चित्र आहे.”

“हो, तुझं म्हणणं बरोबर आहे,” हत्ती म्हणाला. “आत्ता मला त्या उत्कृष्ट कृतीची वास्तविक सुंदरता समजू लागली आहे.”





मग त्याने तो सफेद कॅनव्हास आपल्या काखेत ठेवलं आणि लवकरच घरी परत आला.

तो आता खुशीत आपल्या खुर्चीत बसला आणि तो नेहमी खुश राहू लागला.




आणि मगर? तिने त्या असाधारण सफेद चित्रासारखी अनेक चित्रं रेखाटली, जे अजूनही जगभर प्रसिद्ध आहे, आणि प्रत्येक ठिकाणच्या संग्रहालयात त्याची प्रशंसा होत आहे.



समाप्त